सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने. ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती, जि.अमरावती यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप लेखाशिर्ष-२४१५ ०३३९. (पहिला हप्ता) ( एप्रिल-मे,२०१५)

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०१५/प्र.क्र.८०/योजना-४

बांधकाम भवन, तळ मजला, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २ मे, २०१५.

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन परिपत्रक क्रमांक- ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३) शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.

शासन निर्णय

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (पी) (१) ४१ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना सहाय्यक अनुदाने - (०१) इतर संस्थांना सहाय्य (०१)(०३) श्री. शिवाजी शिक्षण संस्था, अमरावती यांच्या विद्यमाने अमरावती ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती याची स्थापना करणे व त्याचा दर्जा वाढविणे- (सांकेतांक क्र.२४१५ ०३३९), (योजनेत्तर)(दत्तमत)( मागणी क्र. एल -३) अंतर्गत ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती यांना वेतनेतरसाठी रुपये १०.०० लक्ष व वेतनासाठी रुपये ४०.५२ लक्ष अशी एकूण रुपये ५०.५२ लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

२. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या एप्रिल ते मे,२०१५ या कालावधीकरिता वेतनेतरसाठी रु.१.६६/- लक्ष व वेतनासाठी रु. ६.७६/- असे एकूण रुपये ८.४२/- लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन दिले आहे. सदरहू अनुदान ग्राम सेवक प्रशिक्षण, अमरावती यांना एप्रिल-मे,२०१५ या कालावधीकरिता या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण ११९८/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९ /४४, दिनांक १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. विभागीय आयुक्त कार्यालयाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांनी वेतन/वेतनेतर खर्चाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे, याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतर खर्चाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशिक्षण केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

५. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०३३ ९) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्यत-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० मार्च,२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०२११४९०५०३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagawan Bayaji Mahale

Digitally signed by Bhagawan Bayaji Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagawan Bayaji Mahale
Date: 2015.05.02 15:02:31 +05'30'

**( भ. ब. महाले )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, अमरावती (२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. उप महासंचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जि. अमरावती.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, वित्त-८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतींसह)
११. निवड नस्ती का.क्र. योजना-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग